**महसूल विभागामार्फत राज्यात "महसूल दिन"- दिनांक १ ऑगस्ट पासून "महसूल सप्ताह-२०२४" साजरा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०२४/प्र.क्र.१३६/ई-१**
मुख्य इमारत, पहिला मजला,
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
दिनांक- २४ जुलै, २०२४.

**संदर्भ-**
१) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र. संकिर्ण-१०/००/प्र. क्र.३०६/म-५, दिनांक १९.०७.२००२
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र.१२/ई-१, दिनांक ३.०९.२०१०
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-०२/२०१०/प्र.क्र.१२/ई-१, दिनांक ६.०९.२०११
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र. १४९/ई-१, दिनांक २५.०७.२०२३.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये, महसूल विभागाने जिल्हा स्तरीय महसूली कामे वेळच्यावेळी पूर्ण करुन त्यानुसार अभिलेख अद्यावत करणे, वसूलीच्या नोटीसेस पाठविणे, मोजणी करणे, अपिल प्रकरणांची चौकशी करणे इ. कामे वेळच्यावेळी व वेळापत्रकानुसार करणा-या अधिकारी/ कर्मचा-यांचा आणि महसूली वसुलीचे उदिष्ट पार करणा-या अधिकारी/कर्मचा-यांचा सत्कार करण्याकरीता आणि महसूल विभागाने केलेल्या कामकाजाचा आढावा जनतेसमोर ठेवण्याकरीता दरवर्षी दिनांक १ ऑगस्ट हा "**महसूल दिन**" म्हणून राज्यभर साजरा करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

तसेच, महसूल विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमध्ये उत्कृष्ट काम करणा-या व नवनवीन संकल्पना राबविणा-या जिल्हाधिकारी यांचा दरवर्षी राज्यस्तरावर "उत्कृष्ट जिल्हाधिकारी" म्हणून प्रशस्तीपत्र व सन्मानचिन्ह देऊन, गौरव-सन्मान करण्याचा निर्णय संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तद्नंतर, याच धर्तीवर विभागनिहाय उत्कृष्ट काम करणा-या अपर जिल्हाधिकारी, उपजिल्हाधिकारी, तहसिलदार, नायब तहसिलदार, अव्वल कारकून, मंडळ अधिकारी, लिपिक, तलाठी, पोलीस पाटील व कोतवाल यांचा उत्कृष्ट अधिकारी/कर्मचारी म्हणून गौरव-सन्मान करण्याचा निर्णय संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

महसूल विभागाकडून देण्यात येणा-या सेवा आणि विभागाद्वारे राबविण्यात येणा-या विविध योजना याबाबत राज्यातील नागरिकांना अधिकाधिक माहिती प्राप्त होऊन त्यांना योग्य लाभ घेता यावा. तसेच, त्याबाबत नागरिकांमध्ये जागरुकता वाढावी, शासनाबद्दल आणि शासनाच्या कामकाजाबद्दल नागरिकांचा विश्वास वृद्धींगत व्हावा, यासाठी विशेष मोहिम व लोकाभिमुख उपक्रम राबविण्याच्या उद्देशाने १ ऑगस्ट महसूल दिनापासून **"महसूल सप्ताह"** साजरा करण्याबाबतचा शासन निर्णय संदर्भ क्र. ४, दिनांक २५ जुलै, २०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

यावर्षी, देखील महसूल दिन- १ ऑगस्ट पासून **“महसूल सप्ताह-२०२४”** साजरा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. महसूल विभागाने जिल्हा स्तरीय महसूली कामे वेळच्यावेळी पुर्ण करुन त्यानुसार अभिलेख अद्यावत करणे, वसूलीच्या नोटीसेस पाठविणे, मोजणी करणे, अपिल प्रकरणांची चौकशी करणे इ. कामे वेळच्यावेळी व वेळापत्रकानुसार करणा-या अधिकारी/कर्मचा-यांचा आणि महसूल वसुलीचे उदिष्ट पार करणा-या अधिकारी/कर्मचा-यांचा सत्कार करण्याकरीता आणि महसूल विभागाने केलेल्या कामकाजाचा आढावा जनतेसमोर ठेवण्याकरीता संदर्भ क्र. १, २ व ३ नुसार, **दरवर्षीप्रमाणे दिनांक १ ऑगस्ट, २०२४ हा “महसूल दिन” म्हणून राज्यभर साजरा करण्यात यावा. तसेच, यावर्षी महसूल दिनापासून दिनांक १ ते ७ ऑगस्ट या दरम्यान राज्यभरात “महसूल सप्ताह-२०२४” साजरा करण्यात यावा.**

२. या महसूल सप्ताहामध्ये, प्रत्येक दिवशी जिल्हाधिकारी कार्यालयामार्फत समाजाच्या विविध घटकातील नागरिकांसाठी पुढील प्रमाणे विशेष मोहिम/कार्यक्रम/ उपक्रम/ शिबीरे/महसूल अदालत यांचे आयोजन करण्यात यावे. **सदर “महसूल सप्ताह” मध्ये घ्यावयाच्या कार्यक्रमाचा तपशिल शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट** येथे नमुद केल्याप्रमाणे असून सर्व विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी कार्यालयांनी त्याप्रमाणे उचित कार्यवाही करावी.

| दिनांक | कार्यक्रमाचे स्वरुप |
|---|---|
| १ ऑगस्ट | “ महसूल दिन साजरा करणे व महसूल सप्ताह शुभारंभ”<br>“ मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण योजना” |
| २ ऑगस्ट | “मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना” |
| ३ ऑगस्ट | “ मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना” |
| ४ ऑगस्ट | “स्वच्छ व सुंदर माझे कार्यालय” |
| ५ ऑगस्ट | “ सैनिक हो तुमच्यासाठी” |
| ६ ऑगस्ट | “एक हात मदतीचा- दिव्यांगांच्या कल्याणाचा” |
| ७ ऑगस्ट | “ महसूल संवर्गातील कार्यरत/सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी संवाद उत्कृष्ट अधिकारी/ कर्मचारी पुरस्कार वितरण” व महसूल सप्ताह सांगता समारंभ” |

३. **सदर महसूल सप्ताह कालावधीत संचालक, भूमी अभिलेख, पुणे आणि नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांनी त्या-त्या उपविभागाशी संबंधित योजनांच्या अनुषंगाने विशेष शिबीरे/कार्यक्रम आयोजित करण्यात यावीत.**

४. महसूल विभाग, जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे आणि नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे यांच्यामार्फत राबविण्यात येणा-या विविध शासकीय योजनांची माहिती विशद करणा-या लघु चित्रफिती (Small Videos) तयार करुन विविध प्रसारमाध्यमाव्दारे सदर माहिती जनतेपर्यंत पोहचविण्याच्या उद्देशाने उचित कार्यवाही करावी.

५. दिनांक १ ऑगस्ट पासून “**महसूल सप्ताह**” आयोजनाच्या अनुषंगाने किमान ४ ते ५ दिवस आधीपासून या कार्यक्रमांची रुपरेखा, कार्यक्रमांचे स्वरुप, वेळापत्रक, शासनाच्या विविध कल्याणकारी योजना नागरिकांस/जनतेस कश्याप्रकारे लाभदायक ठरणार आहेत, हे अधोरेखित

करुन प्रसिध्दीपत्रक तयार करुन त्याचे वितरण करण्यात यावे. तसेच, जिल्हयातील आघाडीची वृत्तपत्रे, वृत्तवाहिन्या व सोशल मिडीया याव्दारे या कार्यक्रमांचा प्रचार व प्रसिध्दी करण्यात यावी.

६. या कार्यक्रमाच्या आयोजनापुर्वी, आयोजनादरम्यान व आयोजनपश्चात प्रसिद्धीसाठी स्थानिक प्रसिद्धी माध्यमांचे सहकार्य घ्यावे. महसूल सप्ताहामधील कार्यक्रम अधिकाधिक आकर्षक आणि नाविन्यपूर्ण करण्याच्या दृष्टीने, सर्व संबंधित अधिका-यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रामध्ये त्या-त्या भागातील गरजा, भौगोलिक परिस्थिती इत्यादी विचारात घेऊन त्याप्रमाणे या कार्यक्रमाची अंमलबजावणी करावी.

७. प्रत्येक जिल्हाधिकारी/उप विभागीय अधिकारी/तहसिलदार कार्यालयांमध्ये हेल्पडेस्क किंवा हेल्पलाईन किंवा व्हॉट्सॲपव्दारे मदत करण्याकरीता यंत्रणा/कक्ष तयार करुन गरजू नागरिकांना मार्गदर्शन तसेच त्यांच्या शंकांचे निरसन करुन त्यांची कामे पुर्ण करण्याकरीता आवश्यक ती व्यवस्था/कार्यवाही करण्यात यावी.

८. जिल्हाधिका-यांनी महसूल सप्ताहामध्ये शासनाचे महत्त्वाचे कायदे, विकास योजना, उपक्रम, धोरणे यांस प्रसिद्धी मिळण्याच्या अनुषंगाने याबाबतची सखोल माहिती असलेल्या तंज्ञाच्या मुलाखती/व्याख्याने यांचे प्रक्षेपण स्थानिक वृत्तवाहिन्यांवर करण्यात यावे.

९. महसूल विभागामार्फत देण्यात येणारे विविध दाखले आणि प्रमाणपत्रे, त्यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रांबाबतची माहितीपत्रके तयार करुन नागरिकांना याचा अधिकाधिक लाभ घेण्याच्या अनुषंगाने महसूल सप्ताहामध्ये प्रचार व प्रसिद्धी करण्यात यावी.

१०. सदर महसूल सप्ताह कालावधीत सर्व घटकातील नागरिकांचा सहभाग अपेक्षित असल्याने, अशा कार्यक्रम/कार्यशाळा याचे आयोजन करताना याबाबत विशेष काळजी घेण्यात यावी.

११. प्रत्येक जिल्हाधिकारी कार्यालयाने महसूल सप्ताहाच्या अनुषंगाने आयोजित केलेल्या कार्यक्रमांच्या **फलनिष्पत्तीबाबतचा संपुर्ण अहवाल छायाचित्रांसह** विभागीय आयुक्त यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

१२. महसूल सप्ताहाच्या आयोजनाचा खर्च त्या-त्या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चांसाठी असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. या कार्यक्रमांच्या आयोजनावेळी अनावश्यक खर्च टाळण्यात यावा. तसेच, कार्यक्रमाच्या आयोजनासाठी आवश्यकतेनुसार विभागीय आयुक्तांचे मार्गदर्शन घ्यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७२४१०४२३५८४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJESH KUMAR

Digitally signed by RAJESH KUMAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=1e08bc9f719f8ce54a66aed8ed2a521ee2d571facec17b204b286a31e88c58d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=65054D119A082276260F8A89874FD83D0D6D6A635CF1AEF6E1C9B580CAACC3B0, cn=RAJESH KUMAR
Date: 2024.07.24 10:59:46 +05'30'

**( राजेश कुमार )**
**अपर मुख्य सचिव, महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह)/मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. विभागीय आयुक्ते (सर्व)
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे
९. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, पुणे
१०. विभागीय उपायुक्त (महसूल/सामान्य), विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
११. जिल्हाधिकारी (सर्व)
१२. निवासी उपजिल्हाधिकारी (सर्व)
१३. उपविभागीय अधिकारी /तहसिलदार/नायब तहसिलदार (सर्व)
१४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६. सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. निवडनस्ती (ई-१)

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्रक्र १३६/ई-१, दिनांक २४ जुलै, २०२४ सोबतचे परिशिष्ट**

| दिनांक | कार्यक्रमाचे स्वरुप |
|---|---|
| १ ऑगस्ट | **"महसूल दिन साजरा करणे व महसूल सप्ताह शुभारंभ"**<br>**" मुख्यमंत्री माझी लाडकी बहीण योजना"**<br>अ) राज्यातील महिलांच्या आर्थिक स्वातंत्र्यासाठी, त्यांच्या आरोग्य आणि पोषणामध्ये सुधारणा करणे आणि कुटुंबातील त्यांची निर्णायक भूमिका मजबूत करणे, यांसाठी महाराष्ट्र राज्यात "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजना सुरु करण्यास शासन निर्णय, दिनांक २८.०६.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.<br>आ) "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजनेचा लाभ मिळण्यासाठी अर्जदारांना राज्याचे अधिवास प्रमाणपत्र/ राज्यातील जन्म दाखला, सक्षम प्राधिकारी यांनी दिलेला कुटुंब प्रमुखांचा उत्पन्नाचा दाखला, रेशनकार्ड, आधारकार्ड इ. कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहेत. सदर योजनेचा लाभ अधिकाधिक महिलांना प्राप्त व्हावा, त्यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे त्यांना तातडीने उपलब्ध व्हावीत यासाठी विशेष शिबीर आयोजित करण्यात यावे त्यासाठी आवश्यतेनुसार मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात यावे<br>इ) "मुख्यमंत्री- माझी लाडकी बहीण" योजनेचे अर्ज पोर्टल/मोबाईल ॲप/ सेतू सुविधा केंद्रे येथून ऑनलाइन भरण्याची तरतूद करण्यात आली आहे. सदर योजनेचा लाभ मिळण्यासाठी आवश्यक असणारी काही कागदपत्रे/ दाखले आपले सरकार पोर्टलद्वारे, महा- ऑनलाइन प्रणालीद्वारे प्रदान करण्यात येतात. या योजनेच्या अनुषंगाने लाभार्थ्यांचे मोठ्या प्रमाणावर अर्ज प्राप्त होण्याची शक्यता असल्याने महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाशी समन्वय साधून पोर्टल व डेटा सेंटर सुरळीतपणे सुरु राहील याची कृपया दक्षता घेण्यात यावी.<br>ई) सदर योजनेअंतर्गत अर्ज करण्यासाठी सरकार सेवा केंद्र/ ई-सेवा केंद्र/सेतू केंद्र/ तहसिल कार्यालये इ. येथे उपस्थित राहणा-या महिला अर्जदारांना आणि त्यांच्या प्रतिनिधींना सौजन्याची वागणूक देण्याबाबत आणि त्यांना आवश्यक ती मदत व सहकार्य करण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.<br>उ) सदर योजनेच्या लाभापासून एकही पात्र वंचित राहणार नाही, याबाबत विशेष दक्षता घ्यावी. |
| २ ऑगस्ट | **"मुख्यमंत्री युवा कार्य प्रशिक्षण योजना"**<br>अ) राज्यातील युवकांना त्यांच्या शिक्षणानंतर प्रत्यक्ष कामाचे प्रशिक्षण देवून त्यांची नोकरी मिळण्याची क्षमता वाढविण्यासाठी शासन निर्णय, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, दिनांक ९.०७.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.<br>आ) सदर योजनेचा लाभ अधिकाधिक युवकांना प्राप्त व्हावा, त्यासाठी अधिवास प्रमाणपत्र, आधारकार्ड इ. आवश्यक असणारी कागदपत्रे त्यांना तातडीने उपलब्ध व्हावीत यासाठी विशेष शिबीर आयोजित करण्यात यावे त्यासाठी आवश्यतेनुसार मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात यावे. |

| | |
|---|---|
| ३ ऑगस्ट | <u>**" मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना"**</u><br>अ) सर्वसामान्य ज्येष्ठ नागरिकांना देशातील मोठया तीर्थ स्थळांना जाऊन मनःशांती तसेच अध्यात्मिक पातळी गाठणे सुकर व्हावे यासाठी राज्यातील सर्व धर्मातील ज्येष्ठ नागरिक जे ६० वर्षे किंवा त्याहून अधिक वयाचे आहेत त्यांना राज्य आणि भारतातील तीर्थक्षेत्रांना मोफत भेटीची/दर्शनाची संधी देण्यासाठी शासन निर्णाय, सामाजिक न्याय विभाग, दिनांक १४.०७.२०२४ अन्वये "मुख्यमंत्री तीर्थ दर्शन योजना" सुरु करण्यात आली आहे. या योजनेच्या लाभासाठी अर्जदारांना राज्याचे अधिवास प्रमाणपत्र/ राज्यातील जन्म दाखला, सक्षम प्राधिकारी यांनी दिलेला कुटुंब प्रमुखांचा उत्पन्नाचा दाखला, रेशनकार्ड, आधारकार्ड इ. कागदपत्रे सादर करणे आवश्यक आहेत. सदर योजनेचा लाभ अधिकाधिक ज्येष्ठ नारिकांना प्राप्त व्हावा, त्यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे त्यांना तातडीने उपलब्ध व्हावीत यासाठी विशेष शिबीर आयोजित करण्यात यावे त्यासाठी आवश्यतेनुसार मनुष्यबळ उपलब्ध करुन देण्यात यावे.<br>आ) सदर योजनेचे अर्ज पोर्टल/ मोबाईल ॲप / सेतू सुविधा केंद्र येथून भरण्याची तरतूद करण्यात आली आहे. या योजनेचा लाभ अधिकाधिक ज्येष्ठ नागरिकांना प्राप्त व्हावा त्यासाठी विशेष कक्ष आयोजित करुन अर्ज भरण्यासाठी ज्येष्ठ नागरिकांना आवश्यक मार्गदर्शन आणि सहकार्य करण्यात यावे.<br>इ) सेतू केंद्र/ तहसिल कार्यालये इ. येथे उपस्थित राहणा-या ज्येष्ठ नागरिकांना आणि त्यांच्या प्रतिनिधींना सौजन्याची वागणूक देण्याबाबत आणि त्यांना आवश्यक ती मदत व सहकार्य करण्याबाबत सर्व संबंधितांना सूचना देण्यात याव्यात.<br>ई) मुख्यमंत्री वयोश्री योजनेबाबत जिल्हा/तालुका स्तरावर व्यापक प्रसिध्दी देऊन जनजागृती निर्माण करावी.<br>उ) या योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने संबंधित विभागांसोबत समन्वय साधुन योजनेचा लाभ जास्तीत जास्त लाभार्थ्यांपर्यत पोहचण्यासाठी उपाययोजना कराव्यात.<br>ऊ) या योजनेकरीता आवश्यक असलेले उत्पन्नाचे दाखले, शासनामार्फत ओळख पटविण्यासाठी विहित केलेली अन्य कागदपत्रे संबंधित लाभार्थ्यांना उपलब्ध करुन द्यावी. |
| ४ ऑगस्ट | <u>**"स्वच्छ व सुंदर माझे कार्यालय"**</u><br>अ) विशेष मोहिम राबवून जिल्हास्तरावरील, तालुकास्तरावरील, मंडळ स्तरावरील व ग्रामस्तरावरील कार्यालयांची व परिसराची साफसफाई करावी.<br>आ) कार्यालयाचे अभिलेख व दस्तऐवज यांचे वर्गीकरण व व्यवस्थापन, निंदणीकरण व महत्वाच्या दस्ताऐवजांचे स्कॅनिंग व संगणकीकरण करण्यासाठी विशेष मोहिम राबवावी.<br>इ) सेवा हक्क अधिनियमानुसार अधिसूचित सेवा, यासाठी आवश्यक असणारी कागदपत्रे, शुल्क, सक्षम प्राधिकारी इत्यादी माहिती दर्शविणारे फलक अद्यावत करावेत.<br>ई) शासनाच्या विविध योजनांची माहिती प्रसिध्दीपत्रक स्वरुपात लाभार्थ्यांपर्यत पोहचवावी.<br>उ) शासनाच्या विविध कार्यालयांमध्ये कार्यरत असलेल्या विभाग प्रमुख/कर्मचारी यांची नावे व संपर्क क्रमांक असलेले फलक व माहितीपुस्तके अद्यावत करण्यात यावीत.<br>कार्यालयातील अनावश्यक फर्निचर, कागदपत्रे विहित कार्यपध्दत अवलंबुन दुरुस्त व आवश्यकतेनुसार नष्ट करावीत. |

| | |
|---|---|
| ५ ऑगस्ट | "सैनिक हो तुमच्यासाठी"<br>अ) राष्ट्रीय सुरक्षिततेच्या कामी सीमावर्ती भागामध्ये व सुरक्षिततेच्या दृष्टीने अन्य संवेदनशील भागांमध्ये तैनात असणारे संरक्षण दलातील अधिकारी, सैनिक यांना व त्यांच्या कुंटुंबियांना आवश्यक असणारे, महसूल कार्यालयांकडून निर्गमित होणारे विविध दाखले/प्रमाणपत्रे मिळणेबाबत जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी किंवा समादेशक अधिकारी यांच्याकडून प्राप्त झालेले अर्जावर कार्यवाही करण्यात यावी.<br>आ) संरक्षण दलात कार्यरत असताना शहीद झालेल्या कर्मचा-यांना जमीन वाटप करण्याबाबत प्रलंबित असलेल्या अर्जांवर कार्यवाही करण्यात यावी. तसेच, संरक्षण दलातून सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांना घरासाठी/शेतीसाठी जमीन वाटपाबाबत प्रलंबित असलेली प्रकरणे तात्काळ निकाली काढण्यात यावीत.<br>इ) ई) जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी कार्यालयाशी समन्वय साधुन संरक्षण दलातील कर्मचा-यांचे महसूल विभागाशी संबंधित प्रलंबित प्रश्न निकाली काढण्यात यावेत. |
| ६ ऑगस्ट | "एक हात मदतीचा- दिव्यांगांच्या कल्याणाचा"<br>अ) राज्याच्या दिव्यांग व्यक्तींकरीता शासनाच्या वतीने राबविण्यात येणा-या विविध योजना/उपक्रमांबाबतची माहिती उपलब्ध करुन द्यावी.<br>आ) शासनाच्या विविध विभागातील योजनांचा लाभ घेण्याकरीता आवश्यक असणा-या व महसूल विभागाशी संबंधित विविध दाखले/प्रमाणपत्र उपलब्ध करुन द्यावी.<br>इ) विविध योजनाअंतर्गत देण्यात येणा-या लाभांच्या अनुषंगाने जिल्हा/तालुका स्तरावर शिबीर आयोजित करुन स्वयंसेवी संस्थांच्या मदतीने उपकरणांचे वाटप करण्यात यावे.<br>ई) अनाथ मुले-मुली म्हणजे आई-वडील मृत्युमुखी पडल्यामुळे अनाथ झालेली व कोणत्याही शासकीय/निमशासकीय/शासन अनुदानित अनाथ आश्रमात न राहणारे मुले-मुली यांना लाभ देण्याच्या अनुषंगाने अनाथ असल्याचे तलाठी व ग्रामसेवक यांचे व संबंधित महिला व बाल विकास अधिकारी यांचे प्रमाणपत्र देण्याच्या अनुषंगाने विशेष मोहिम राबविण्यात यावी. तसेच, या अनाथ मुलांना अनुज्ञेय असलेले लाभ मिळण्याच्या अनुषंगाने या क्षेत्रात काम करणा-या सामाजिक संस्थांची आवश्यकतेनुसार मदत घेण्यात यावी. |
| ७ ऑगस्ट | " महसूल संवर्गातील कार्यरत/सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी संवाद उत्कृष्ट अधिकारी/ कर्मचारी पुरस्कार वितरण व महसूल सप्ताह सांगता समारंभ"<br>अ) संदर्भ क्र. १, २ व ३ मधील तरतुदीनुसार विभागनिहाय उत्कृष्ट काम करणा-या अपर जिल्हाधिकारी, उपजिल्हाधिकारी, तहसिलदार, नायब तहसीलदार, अव्वल कारकून, मंडळ अधिकारी, महसूल सहाय्यक, तलाठी, पोलीस पाटील व कोतवाल यांचा उत्कृष्ट अधिकारी/कर्मचारी म्हणून गौरव-सन्मान करण्यात यावा.<br>आ) विभाग़ीय आयुक्त कार्यालयामार्फत विभाग स्तरावर आयोजित करण्यात आलेल्या विविध स्पर्धांमध्ये (कला/साहित्य/क्रीडा इ.) यशस्वी ठरलेल्या अधिकारी/ कर्मचारी यांचा सत्कार करण्यात यावा.<br>इ) महसूल संवर्गातील जिल्हयात कार्यरत असलेल्या, सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या विविध प्रलंबित सेवाविषयक बाबी निकाली काढण्याच्या दृष्टीने |

| | |
|---|---|
| | जिल्हाधिकारी कार्यालय, उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांनी व्यक्तीश: संबंधितांच्या अडचणी समजून घेऊन त्या निकाली काढण्याच्या अनुषंगाने संबंधितांना सूचना देऊन आवश्यक ते मार्गदर्शन करावे.<br>ई) महसुल यंत्रणेमार्फत उपरोक्त कालावधीत घेण्यात आलेल्या विविध उपक्रमांबाबतची फलनिष्पत्ती व विशेष उल्लेखनीय कामकाजाची दखल घेण्यासाठी महसूल सप्ताहाचा सांगता समारंभ आयोजित करण्यात यावा.<br>उ) सदर कार्यक्रमास लोकप्रतिनिधी/पदाधिकारी, ज्येष्ठ नागरिक, स्वयंसेवी/ सामाजिक संस्थांचे प्रतिनिधी, विविध प्रसारमाध्यमांचे प्रतिनिधी, सर्व घटकातील मान्यवर व्यक्ती इ. तसेच, अन्य विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना निमंत्रित करण्यात यावे. |

**-*-*-*-*-*-.**